# माणसाचा जन्म कुठून होतो? का होतो? तो जन्म घेण्यापुर्वी कुठे होता?

**डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग ६**

**E Book 171**

## डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? -६

**प्राचार्य अद्वयानंद गळतगे भोज, जि बेळगाव. कर्नाटक 59 1263. भ्र. ९९०२००२५८५**




## शास्त्रीय सिद्धांताची कसोटी

माणसाचा जन्म कुठून होतो, का होतो, तो जन्म घेण्यापुर्वी कुठे होता या प्रश्नांची उत्तरे जड विज्ञानावर आधारलेला डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत कसे देऊ शकत नाही हे मागच्या लेखात आपण पाहिले. अध्यात्म विज्ञानाचा सिद्धांत या प्रश्नांची उत्तरे देतो काय, देत असेल तर कसे देतो हे आता आपल्याला या लेखात पाहावयाचे आहे. त्यासाठी अध्यात्माचा सिद्धांत कोणता व तो वैज्ञानिक ( शास्त्रीय) आहे काय, हे प्रथम पाहिले पाहिजे. कारण विज्ञानपद्धतीमुळेच सत्याचा शोध घेता येतो. एकादा सिद्धांत वैज्ञानिक

आहे काय हे तो सिद्धांत भाकिते करतो काय व ती भाकिते प्रत्यक्ष प्रयोगाने खरी ठरतात काय यावर अवलंबून असते. वैज्ञानिक सिद्धांताच्या सत्याची ही कसोटी आहे. या कसोटीवर डार्विनचा उत्क्रांतिवाद सिद्धांत भाकितेच करत नसल्यामुळे (ती खरी ठरण्याचा प्रश्नच नाही) तो सिद्धांत अवैज्ञानिक ( व म्हणून असत्य) असल्याचे आपण मागच्या लेखातील 'डार्विनचा सैद्धांतिक मृत्यू' या पोट मथळ्याखाली पाहिले आहे. उलट जडवाद व त्यावर आधारलेला डार्विनवाद खोटा ठरविणारा व अध्यात्मवादाचे सैद्धांतिक समर्थन करणारा भौतिक विज्ञानाचा क्वांटम सिद्धांत भाकिते तर करतोच, शिवाय ती भाकिते प्रत्यक्ष प्रयोगाने खरी ठरलेली आढळून येतात. (भाकिते खरी ठरविणारा क्वांटम सिद्धांताचा हा प्रयोग 'ई पी आर पॅराडॉक्स' या नावाने प्रसिद्ध असल्याचे मागच्या लेखात आपण पाहिले आहे.) त्यामुळे तो सिद्धांत शास्त्रीय सत्य म्हणून (भौत वैज्ञानिकांना 'समजत' नसला तरी!) भौत शास्त्रीय जगात स्वीकारला गेला आहे.[मात्र क्वांटम सिद्धांत अध्यात्माचे सैद्धांतिक समर्थन करत असला तरी क्वांटम सिद्धांतामुळे आध्यात्मिक सिद्धांत खरा ठरत नसून आध्यात्मिक सिद्धांतामुळे क्वांटम सिद्धांत खरा ठरतो हे येथे लक्षात घेणे आवश्यक आहे. कारण अंतिम सत्य अध्यात्म आहे, भौतिकता नाही, भौतिक जगाचा जन्म अध्यात्मतत्त्वातून झालेला असल्यामुळे भौतिक विज्ञानाचा क्वांटम सिद्धांत अध्यात्मतत्त्वाचे समर्थन करणे क्रमप्राप्तच आहे ] या ( भाकिते करण्याच्या) निकषानुसारआध्यात्मिक सिद्धांत कोणता, तो कोणती भाकिते करतो, व ती भाकिते प्रत्यक्ष प्रयोगाने खरी ठरतात काय हे आता आपल्याला पाहावयाचे आहे.



प्राचार्य अद्वयानंद गळतगे आपल्या कुटुंबियासमावेत भोज मधील फार्महाऊस मध्ये (सन२०१२)



छान्दोग्य उपनिषद के श्लोक 1.1.1-1.1.9

## अध्याम ( ब्रह्म) विज्ञानाचा सिद्धांत

अध्यात्म वा ब्रह्म विज्ञानाचा सिद्धांत सूत्रमय भाषेत पुढील वाक्यातून मांडला गेला आहे. 'सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति ।' ( छां. उप. ३.१४१) याचा अर्थ असा - ' हे सर्व खरोखर ब्रह्म आहे.( ब्रह्म हा शब्द बृह् - वाढणे, विस्तार वा विकास पावणे या धातूपासून बनलेला आहे. त्यामुळे) ह्या ब्रह्मापासून सर्व (जग) जन्मते ( विस्तार पावते), त्यातच सर्व जगते व त्यातच (शेवटी) सर्व लीन होते'. 'तद् जलानिति' यातील 'तद्' म्हणजे ब्रह्म, 'ज' म्हणजे जन्मणे, 'ल' म्हणजे लय होणे, 'अन्' म्हणजे जगणे. अशा रीतीने `तज्जलान्', या सूत्राचा अर्थ `सर्व जग, अर्थात जगातील सर्व चराचर जड-अजड वस्तू व त्याचे नियम ब्रह्मापासूनच जन्मतात, ब्रह्मातच जगतात व शेवटी ब्रह्मातच लय होतात' असा आहे. म्हणून 'हे सर्व खरोखर ब्रह्म आहे' (सर्वं खलु इदं ब्रह्म) असे म्हटले आहे. जगाच्या अर्थात जगातील सर्व चराचर वस्तूंच्या जन्म-मरणाच्या फेऱ्याला म्हणूनच 'ब्रह्मचक्र' म्हटले गेले आहे. 'देवस्यैष महिमातु लोके येनेदं भ्राम्यते ब्रह्मचक्रम् ।' (श्वे.उप. ६.१) 'देवाच्या (परब्रह्माच्या) महिम्यामुळे या जगात हे ब्रह्मचक्र(सतत) फिरत आहे, या शब्दात हीच गोष्ट श्र्वेताश्वतर उपनिषद सांगते. 'एष सर्वाणि भूतानि पंचभिर्व्याप्य मूर्तिभिः। जन्मवृद्धिक्षयैर्नित्यं संसारयति चक्रवत् । ।' (मनु. १२.१२४), 'हे (परब्रह्म) पाच भूतांनाव्यापून (म्हणजे पाच महाभूतापासून बनलेल्या पिंड व ब्रह्मांड यांच्या व्यक्त स्वरूपात) चक्राप्रमाणे जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सतत फिरत आहे' या शब्दात हीच गोष्ट मनुस्मृतिही सांगते. 'आब्रह्मभुवनाल्लोकाःपुनरावर्तिनोऽर्जुन । मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते । ।' गीता ८:१६) ब्रह्मलोका पर्यंतचे सर्व लोक (त्यातील जीव) पुनरावर्ती (पुनर्पुन्हा जन्म मृत्यूचे फेरे करणारे) आहेत. मला (परब्रह्माला) येऊन मिळणाऱ्या (जीवा) ना मात्र पुनर्जन्म (जन्ममृत्यूचा) फेरा नाही' या शब्दात गीतेत

श्रीकृष्ण भगवान सांगतो व त्या फेऱ्यातून सुटण्याचा उपायही सांगतो.अशारीतीने अध्यात्म विज्ञानाचा सिद्धांत मांडणारे हे सूत्र पुनर्जन्माचे- पुनः पुन्हा जन्मण्याचे व मरण्याचे - भाकीत करत असून ते खरे ठरविण्यासाठी माणसाचा पुनर्पुन्हा जन्म होतो हे सप्रयोग सिद्ध केले पाहिजे. मात्र पुनर्जन्माचा प्रयोग करता येत नाही तो निसर्गतच्च घडत असतो. [भौतिक विज्ञानालाही आपल्या भौतिक सिद्धांताची भाकिते तपासण्यासाठी निसर्गतःघडणाऱ्या प्रयोगावर काहीवेळा अशाच रीतीने अवलंबून राहावे लागत असल्याचे दिसून येते. उदा. आईन्स्टाईनच्या सामान्य सापेक्षता सिद्धांताचे भाकीत तपासण्यासाठी खग्रास सूर्यग्रहण रूपी निसर्गतच्च घडणाऱ्या प्रयोगावर अवलंबून राहावे लागले आहे] या (ब्रह्म सिद्धांताच्या ) निसर्गतच्च घडणाऱ्या पुनर्जन्मरुपी प्रयोगाच्या असंख्य प्रकरणांचे पुरावे अनेक पुनर्जन्म संशोधक शास्त्रज्ञांनी गोळा केले असून त्यापैकी काही निवडक प्रकरणे पुनर्जन्माचे शास्त्रीय सत्य स्वरूप समजून घेण्यासाठी आपल्याला पहावयाचे आहेत.

आपला मुख्य प्रश्न माणसाचा जन्म कुठून होतो, का होतो, तो जन्मण्यापूर्वी कुठे होता हा असून या प्रश्नांची उत्तरे माणसाच्या एकाच पुनर्जन्माच्या प्रकरणातील पुराव्यामुळे मिळणार नाहीत. यासाठी माणसाच्या अनेक जन्मांचे पुरावे तपासावे लागतील. मात्र पुनर्जन्म संशोधक शास्त्रज्ञांनी तपासलेल्या पुनर्जन्माच्या घटना एखाद्या व्यक्तीच्या एक व क्वचित दोन जन्मापुरत्याच मर्यादित असल्याच्या आढळून येतात. पुनर्जन्माचे सत्य शास्त्रीय पद्धतीने सिद्ध होण्यासाठी एकाद्या व्यक्तीच्या एका पुनर्जन्माच्या प्रकरणाचे पुरावे सुद्धा पुरेसे असले तरी त्यातून पुनर्जन्माचे स्वरूप पूर्णपणे स्पष्ट होत नाही. त्यासाठी पुनर्जन्माची अनेक व्यक्तींची प्रकरणे पहावे लागतील. तसेच पुनर्जन्म कर्मसिद्धांताशी निगडित असल्याचे मागे सांगितले आहे. कर्म सिद्धांताचे स्वरूप.(उदा. संचित, प्रारब्ध व आगामी) पुनर्जन्मातून कसे व्यक्त होते हे कळण्यासाठी एकाच व्यक्तीचे शेकडो पुनर्जन्म तपासावे लागतील. ज्ञानी माणसाला सुद्धा बहुत जन्मानंतर ईश्वरप्राप्ती होते (बहुनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्ये ।) या गीतेतील कृष्ण वचनावरून ज्ञानी नसलेल्या माणसाला असंख्य जन्म घ्यावे लागत असले पाहिजेत हे उघड आहे. अशा रीतीने कर्म सिद्धांताचे स्वरूप समर्पकरित्या समजण्यासाठी एखाद्या व्यक्तीची असंख्य जन्मे तपासावे लागतील. हे अर्थात अशक्य आहे. तथापि प्रस्तुत लेखकाला

एका व्यक्तीला आपले पूर्वीचे आठ जन्म आठवत असल्याचे उदाहरण आढळले असून त्याची सत्यापन केलेली माहिती द्यावयाची आहे. आपले बारा पूर्वजन्म आठवणाऱ्या बहेणाबाईचे उदाहरणही तुलनेसाठी द्यावयाचे आहे. तत्पूर्वी पुनर्जन्म प्रकरणांची शास्त्रीय कसोटी खाली तपासलेली काही प्रकरणे पुनर्जन्माचे स्वरूप नीट समजण्यासाठी व पुनर्जन्माचे शास्त्रीय सत्य ते कसे सिद्ध करतात हे कळण्यासाठी पाहणे आवश्यक आहे. ती पुढील लेखातून पाहू. पण जडवादावर आधारलेला डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत मुळात खोटा ठरतो ते पुनर्जन्म प्रकरणाच्या सत्यतेमुळे खोटा ठरत नसून पुनर्जन्म ज्यावर आधारलेला आहे त्या ब्रह्म विज्ञानाच्या ‘सर्व काही खरोखर ब्रह्म आहे’ (सर्वं खल्विदं ब्रह्म) या मूळ अध्यात्मिक (ब्रह्म) सिद्धांतामुळे खोटा ठरतो, हे लक्षात ठेवले पाहिजे.  त्या ब्रह्म सिद्धांतापासून पुनर्जन्माखेरीज इतर अनेक वचन रुपी भाकिते निष्पन्न होत असून ती डार्विनवाद खोटा ठरवत असल्यामुळे त्यांची माहिती थोडक्यात घेणे अपरिहार्य आहे.

## ब्रह्म सिद्धांताची भाकिते

‘अयम् आत्मा ब्रम्ह’( हा आत्मा ब्रह्म आहे),  ‘अहम् ब्रह्मास्मि’ ( मी ब्रह्म आहे),  ‘प्रज्ञानं ब्रह्म’  (अध्यात्म विवेकशक्ती ब्रह्म आहे), ‘ ब्रह्म सत्यम् जगन्मिथ्या’ ( ब्रह्म सत्य आहे व जग मिथ्या आहे), ‘जीवो ब्रह्मैव नापरः ( जीव ब्रह्मच आहे, वेगळा नाही)  हे सर्व खरोखरच ब्रह्म आहे ( सर्वम् खलु इदम्  ब्रह्म ) या मूळ सिद्धांताची विस्तारित अर्थ सांगणारी अर्थात विस्तारित आध्यात्मिक भाकिते करणारी ही काही वचने असून ती भाकितेच कशी आहेत व ती प्रत्यक्ष प्रयोगानी कशी खरी ठरतात हे पाहणे आवश्यक आहे.

डार्विनचा उत्क्रांतीवाद खोटा सिद्ध करण्यासाठी मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांनी भारतीय जादूगार करत असलेले जादूचे प्रयोग त्याच परिस्थितीत करून दाखवायचे पाश्चात्त्य जादूगारांना आव्हान दिल्याचे व ते आव्हान ते जादूगार स्वीकारू शकले नसल्याचे पहिल्या लेखात आपण पाहिले आहे.  त्यांनी डार्विनवाद खोटा ठरवण्यासाठी जादूच्या प्रयोगाचे उदाहरण का बरे दिले?  कारण जादूचे प्रयोग केवळ आध्यात्मिक नियमानुसारच करता येतात. म्हणून ब्लॅव्हॅट्स्कीनी जादूच्या प्रयोगांना आध्यात्मिक ज्ञान

( Spiritual knowledge) म्हटले आहे.  शिवाय ब्रह्मविज्ञानाचा सिद्धांत सत्य असल्याचे दाखवून देण्यासाठी आद्य शंकराचार्यांनी देखील एका भारतीय प्रसिद्ध ( दोरीच्या)  जादूचेच उदाहरण दिले असून त्या प्रयोगाची माहिती त्याच लेखात दिली आहे (हे उदाहरण त्यांनी  ब्रह्मसूत्रातील 'भेदव्यपदेशाच्च',   ब्र. सू . १.१.१७ या सूत्रावर भाष्य करताना दिले आहे)  अशा रीतीने जादूचे प्रयोग ब्रह्म विज्ञानाचा आध्यात्मिक( ब्रह्म) सिद्धांत सत्य सिद्ध करत असल्यामुळे  'अयं आत्मा ब्रम्ह' म्हणजे हा( जादूगाराचा) आत्मा ब्रह्म आहे, 'जीवो ब्रह्मैव नापरः म्हणजे ( जादूगाराचा)  जीव ब्रह्मच आहे वेगळा नाही;  'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' म्हणजे (जादूगाराचा) जीवात्मा (अशा रीतीने) [ब्रम्ह असल्यामुळे  व तो ब्रह्माप्रमाणेच जादूने (मायेने) पदार्थ निर्माण करण्याचे कार्य करत असल्यामुळे] सत्य आहे व (त्याने जादूने - मायेने  निर्माण केलेले) दृश्य (जग) मिथ्या आहे; ही सर्व ब्रह्म वैज्ञानिक सिद्धांताची वचने वा भाकिते जादूच्या प्रयोगांनी सत्य सिद्ध केली गेली/जात आहेत.

हे जादूचे प्रयोग जादूगार कसे करतो हे माणसाच्या सामान्य बुद्धीला कळत नाही (म्हणून ब्रह्मापासून हे जग कसे निर्माण होते हे माणसाच्या तर्कबुद्धीला कळत नाही.) म्हणून  प्रज्ञानं ब्रह्म,  म्हणजे ब्रह्माची ( प्रच्छन्न ब्रह्म असलेल्या जादूगाराची)  ही आध्यात्मिक विवेक शक्ती( spiritual discriminative power)  किंवा माया शक्ती, सामान्य भाषेत  'जादू' (magic)  आहे, असे म्हटले जाते'. वास्तविक ब्रह्माची ही सृजनशील क्रियाशक्ती (creative power) असून ती जड जगताच्या व त्यातील जीवजातींच्या उत्पत्तीला व उत्क्रांतीला कारणीभूत आहे. सामान्य माणसाला योगाने, भक्तीने, मंत्रतंत्रयंत्र इ. साधनांनी, क्वचित जन्मजात देणगीच्या स्वरूपात (  कदाचित् पूर्वजन्मातील पुण्यकृत्यामुळे)  ही शक्ती प्राप्त होऊ शकते,  प्राप्त झालेली आपण प्रत्यक्ष पाहतो. म्हणून ब्लॅव्हॅट्स्कीनी '  What God does man can do'  म्हणजे जे 'ईश्वर (ब्रम्ह) करतो ते मनुष्य करू शकतो' असे म्हटले आहे.  ब्रह्मसूत्रातही 'एक विश्वोत्पत्ति वगळता बाकी सर्व गोष्टी सिद्ध (मुक्त) पुरुष करू शकतो' ( जगत् व्यापारवर्ज्यम्  - ब्र. सू. ४.४.१७)  असे म्हटले आहे. ब्लॅव्हॅट्स्की यांनी अशा आध्यात्मिक क्रियाशक्तीचे अनेक प्रयोग केले असून नमुन्यासाठी हवेतून गुलाब पुष्पवृष्टी - तीही एकाच्या विनंतीवरून दोनदा - केल्याचे उदाहरण पहिल्या लेखात दिले

आहे. त्यांनी जॉन किंग या नावाची कृत्रिम व्यक्तीही निर्माण केली होती. अलेक्झांड्रा डेव्हिड नील या बाईंनीही कृत्रिमपणे एक साधू ( तिबेटी लामा) निर्माण केला होता. ( तो तिच्याशी शत्रुत्वाने वागू लागल्यामुळे शेवटी कित्येक दिवसांच्या प्रयत्नाने त्याला नाहीसा ही केला होता.) टोरॉंटो ( कॅनडा) येथील काही स्त्रियांनी एकत्र येऊन सामूहिक प्रयोगातून एका काल्पनिक व्यक्तीचे भूत निर्माण केले होते, ज्याचे प्रात्यक्षिक दूरचित्र वाहिनीवरून जाहीरपणे दाखवण्यात आले होते. सामान्य माणसाच्या जीवनात सुद्धा ईश्वर वा गुरु भक्तीमुळे, तीव्र श्रद्धेमुळे अशा प्रकारच्या, ब्रह्म सिद्धांताची भाकिते खरी ठरविणाऱ्या घटना घडत असल्याची अनेक उदाहरणे असून त्यापैकी काही माझ्या इतर ग्रंथातून दिली आहेत. त्या ग्रंथात न दिलेले एक उदाहरण नमुन्यासाठी येथे देतो.




एकदा कोल्हापूरचे चिले महाराज, ज्यांना त्यांचे भक्त ‘गुरुदेव’ म्हणत असत, आपल्या रामचंद्र दत्तात्रय लळीत या भक्ताला सोबत घेऊन गंगावेस जवळील चिपचिप महाराजांच्या देवळासमोरच्या एका माऊलीच्या घरी सकाळी दहा वाजता गेले. रामचंद्रपंत लळीत हे शेतकरी सहकारी संघात नोकरी करत होते. अकरा वाजता त्यांना ऑफिसला जावयाचे होते. पण गुरुदेव माऊलीच्या घरातून निघण्याचे काही चिन्ह दिसेना. लळीत गुरुदेवांची साथ सोडू शकत नव्हते. गुरुदेव दुपारी अडीच वाजता त्या माऊलीच्या घरातून बाहेर पडले व लळीतांना म्हणाले, ‘आता तू जा’. लळितांनी लगेच थेट ऑफिस गाठले व सही करण्यासाठी हजेरी बुक उघडले तेव्हा आपली सही अकरा वाजता झालेली पाहून ते आश्चर्यचकित झाले. दुपारच्या सुटीनंतर त्यांचा वर्गमित्र बाहेरून आला. त्यांना पाहताच एक मित्र म्हणाला, “ अहो लळीत साहेब, आज चहा प्यायला आम्हाला सोडून एकटेच दुसरीकडे कसे गेलात? काय विशेष?” खरे सांगावे तर हे लोक बुचकळ्यात पडतील, म्हणून काहीतरी सांगून त्यांनी वेळ मारून नेली. ह्या लोकांनी आपल्याला ११ ते २ ऑफीसमध्ये पाहिले आणि चहाच्या सुट्टीत आपण एकटेच यांना सोडून गेलो, हे सहकाऱ्यांच्या बोलण्यावरून लळितांना समजून आले. याआधी गुरुदेवांनी रामचंद्रपंतांना अनेक अमोल अनुभव दिले होते. त्यामुळे ही लीला गुरुदेवांनी केली हे

त्यांना कळून चुकले. रामचंद्रपंत देवांच्याबरोबर त्या माऊलीच्या घरात आणि त्याच वेळी ऑफिसातही (परब्रम्हगुरु चिलेदेव - बाबुराव अथणे १९८७ पृ.६७) माणसाचा, उदा. येथे गुरुदेवांबरोबर माऊलीच्या घरात असलेल्या रामचंद्रपंतांचा, पूर्वज माकड होता म्हणणारे डार्विनवादी त्याच वेळी शेतकरी संघाच्या ऑफिसमध्ये काम करणाऱ्या या दुसऱ्या रामचंद्रपंतांचा पूर्वज कोण, हे त्यांच्या जीवशास्त्राच्या जनुक थेअरीच्या आधारे सांगू शकतील काय? चिले महाराजांच्या चरित्रग्रंथाला 'परब्रह्मगुरु चिलेदेव' असा मथळा का दिला आहे हे या एकाच उदाहरणावरून स्पष्ट होते. पण या ग्रंथात अशा प्रकारे ब्रह्म सिद्धांताची वचने (भाकिते) खरी ठरवणाऱ्या प्रयोगांची असंख्य उदाहरणे पाहावयास मिळतात.

## जडवाद खोटा कसा?

रमेश या माझ्या आजोळच्या चुलत मामे भावाच्या आध्यात्मिक शक्ती बद्दलची स्वानुभवयुक्त माहिती मागे दिली आहे. एकदा आमच्या घरच्या एका समस्येच्या परिहारासाठी आम्ही त्याच्याकडे भिवशी ( माझे आजोळ) गेलो होतो. त्यावेळी त्याने आम्हाला एक फूल दिले व ते जपून ठेवण्यास सांगितले. पण त्याच वेळी ते नाहीसे होईल असे भाकितही केले. म्हणून आम्ही ते एका लहानशा लाकडी पेटीत ठेवून त्याला कुलूप लावले व ती पेटी कपाटात ठेवून दिली. कित्येक महिने आम्ही ते कुलूप काढले नाही. पण नंतर ते सुरक्षित असल्याची खात्री करण्याच्या इच्छेने आम्ही (आई आणि मी) कपाट उघडून त्या पेटीचे कुलूप काढले, तेव्हा आम्हावर आश्चर्यचकित होण्याची पाळी आली. कारण त्या पेटीत ते फूल नव्हते! गायब झाले होते. आता फुलासारखी जड वस्तू कुलूपबंद लाकडी पेटीतून गायब होणे कसे शक्य आहे? रमेशने केलेले भाकीत खरे ठरण्याबरोबरच जड वस्तू जड नसल्याचे सिद्ध करणारी ही घटना आहे. एखाद्या अदृश्य शक्तीने ते फूल पळवून नेले असे समजले तरी कुलूपबंद जड पेटीतून ते पळवुन न्यावे लागत असल्याकारणाने त्या शक्तीला आत प्रवेश देणारी ती वरपंगी जड दिसणारी लाकडी पेटी अंतरंगी जड नाही असेच म्हणावे लागते. आणि वरपंगी जड दिसणारी लाकडी पेटी अंतरंगी जड नसेल तर वरपंगी जड दिसणारे फुल अंतरंगी जड आहे असे तरी कसे म्हणता येईल? अशा रीतीने कुलूपबंद लाकडी पेटीतून फूल अदृश्य होणे ही घटना अंतरंगी फुल जड नसल्याचे सिद्ध करते. म्हणूनच जडवादी भौत वैज्ञानिक कुलूपबंद जड लाकडी पेटीतून फूल अदृश्य होणाऱ्या या घटनेची उपपत्ती भौतवैज्ञानिक

नियमाच्या आधारे देऊ शकत नाहीत. कारण ही घटना भौत वैज्ञानिक नसून अध्यात्म ( ब्रम्ह) - वैज्ञानिक आहे. कारण जगाचे जडत्व मायावी असल्याचे ती सिद्ध करते.  ब्रम्ह सिद्धांताच्या 'जगन् मिथ्या'त्वाचे भाकीत खरे ठरवणाराच हा प्रयोग आहे.

जड वस्तू बाह्यांगी जड दिसत असली तरी अंतरंगी ती अजड असल्याचे संत व सत्पुरुषांच्या चरित्रातील असंख्य घटना सिद्ध करतात.  नमुन्यासाठी येथे होवार्ड मर्फेट यांनी लिहिलेल्या सत्यसाईबाबांच्या चरित्रातील एका घटनेची संक्षिप्त माहिती देतो. ८० वर्षांची वेंकटमुनींची आई मरणोन्मुख अवस्थेला पोचली असताना त्यांच्या पत्नीने सत्यसाईबाबांनी त्यांना दिलेली जपमाला त्यांच्या छातीवर ठेवली. बाबांनी आणिबाणीच्या काळी आजार बरा करणारी जपमाला त्या कुटुंबाला दिली होती. त्याचा परिणाम होऊन त्या मरणोन्मुख मातोश्री पूर्ण बऱ्या झाल्या व नंतर बरीच वर्षे जगल्या. पुढे त्यांचा एक फेफरे ( अपस्मार)  येणारा मुलगा आजारी पडला. तेव्हा त्यांच्या पत्नीने




त्याला बरे करण्यासाठी देव्हाऱ्याच्या खोलीत इतर वस्तू बरोबर ठेवलेली ती जपमाला आणण्यासाठी गेल्या. परंतु ती घेण्याचा कितीही प्रयत्न केला तरी ती जपमाळा त्यांच्या हातात सापडेना. प्रत्येक वेळी त्यांच्या हातातून ती निसटत होती. शेवटी निरुपाय होऊन त्या मोकळ्या हाताने परत आल्या व पतीला कितीही प्रयत्न केला तरी ती जपमाला हातात सापडत नसल्याचे सांगू लागल्या.  ही बाबांची इच्छा असे समजून दोघांनी स्वतःचे समाधान करून घेतले. नंतर तो मुलगा वारला. आयुष्य मर्यादा ठरविणारे कर्म बलवत्तर असेल तर ब्रह्मस्वरूपी सत्यसाईबाबासुद्धा त्यात हस्तक्षेप करू शकत नसल्याचे त्या जपमाळेने आपल्या वर्तणुकीने सिद्ध केल्याचे येथे दिसून येते. (SAI BABA:  Man of Miracles - Howard Murphet, 1993 p.134)

जड असलेली जपमाला हातातून निसटण्याचा हा प्रकार अविश्वसनीय वाटत असला तरी जड फूल कुलूपबंद पेटीतून गायब होण्याच्या प्रकारापेक्षा काही तो जास्त अविश्वसनीय नाही, किंवा पहिल्या लेखात वर्णिलेल्या रुपयाचा नाग साप बनवण्याच्या किंवा जळणाऱ्या कागदाची कबुतरे बनवण्याच्या प्रकारापेक्षाही जास्त अविश्वसनीय नाही. जड जग सत्य मानणाऱ्यांना अविश्वसनीय वाटणारे हे सर्व प्रकार म्हणजे ' सर्वं खल्विदं ब्रम्ह' किंवा 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' या अध्यात्म (ब्रम्ह) सिद्धांताची भाकिते सत्य ठरवणारे प्रत्यक्षात केले गेलेले प्रयोग आहेत. चेतन ब्रह्मापासून निर्माण झालेले जड जग वरपांगी जड दिसत असले तरी अंतरंगी चेतनच असल्याचे दाखवून देणारा प्रयोग खुद्द जड विज्ञानानेच केला असून फोटॉन किंवा इलेक्ट्रॉनच्या दुहेरी छिद्राचा प्रयोग (Double slit experiment) या नावाने तो प्रसिद्ध आहे.((प्रस्तुत लेखकाचा 'विज्ञान आणि बुद्धिवाद' हा ग्रंथ या प्रयोगाच्या माहितीसाठी पाहा.) म्हणूनच F Dyson या भौत शास्त्रज्ञाने म्हटले आहे की ' Mind is inherent in every electron and the processes of human consciousness differ only in degree and not in kind from the processes of choice between quantum states which we call chance when they are made by electrons'. ( DISTURBING THE UNIVERSE - F. Dyson 1979, p.249)



म्हणजे ‘ प्रत्येक विद्युत कणाला मन हे अंगभूतच आहे. मानवी मनाच्या व विद्युत कणांच्या निवड प्रक्रियेमध्ये गुणात्मक फरक नसून फक्त प्रमाणात्मक फरक आहे. एकादी क्वांटम अवस्था विद्युत कणाने निवडली असता (तीच का निवडली हे कळत नसल्यामुळे) आम्ही त्याची संभावना योगायोग या शब्दाने करतो, इतकेच. ‘ निवडणे (choice)’ याचा अर्थच ‘ जाणीव ( बुद्धी) असणे’ असा आहे.

अशा रीतीने चेतन ब्रम्ह सत्य व चेतन ब्रह्मापासून निर्माण झालेले जड जग, म्हणजेच जड जगाचे जडत्व मिथ्या ही गोष्ट एक फूल ( रमेशच्या भाकिताप्रमाणे) कुलूपबंद पेटीतून नाहीसे झाल्याचा माझा अनुभव सिद्ध करत असला तरी हा एक किरकोळ प्रयोग वाटेल. म्हणून निसर्गतच्च घडलेल्या एका प्रयोगाचा एका सत्पुरुषाचा अनुभव येथे थोडक्यात कथन करतो. गुजरात मधील भद्रन (आनंद) येथील आश्रमाचे कृष्णानंद स्वामी गिरनार पर्वत चढत होते.अंबाजी मंदिराजवळ ते पोचले तेव्हा एका अरण्य खात्यातील कामगार त्यांना भेटला. त्याने एका वाकड्या वळणाच्या रस्त्याकडे बोट दाखवून म्हटले की “दोन फर्लांगावर एक छोटे शंकराचे मंदिर असून तेथे थोडा वेळ घालवणे तुम्हाला आवडेल”. कृष्णानंदांना तेथे जावेसे वाटले. ते त्या रस्त्याने गेले. खरोखरच ३००फुटावर एक शिवालय गर्द झाडीमध्ये होते. जवळच एक शुद्ध पाण्याचा ओढा वाहत होता. कृष्णानंदांनी त्या ओढ्यात अंघोळ केली. व शिवालयात जप केला. जप करून ते आल्या रस्त्याने परत फिरले. नंतर त्यांना कळले की आज गुरुवार आहे. वास्तविक ते बुधवारी त्या शिवालयात गेले होते. ते बुचकळ्यात पडले. आपण त्या शिवालयात २४ तास घालवले हे त्यांच्या लक्षात येताच ते परत त्या शिवालयाचा शोध घेण्यासाठी निघाले. पण त्यांना ते सापडले नाही. तिथल्या कामगारांना त्या शिवालयाबद्दल त्यांनी विचारले, तेव्हा त्यांनी असले शिवालय येथे नसल्याचे त्यांना सांगितले. तो अरण्यखात्यातील कामगार कोण होता याचाही पत्ता लागला नाही. आजतागायत याचे गूढ उकललेले नाही असे कृष्णानंद यांनी म्हटले आहे. (TRUE EXPERIENCES - Krishnanand, 1991 - pp.38-41)

या प्रकरणातील शिवालय व जवळच वाहत असलेला ओढा हे कृष्णानंदांना खोटे होते असे म्हणता येणार नाही. कारण त्यांनी त्या ओढ्यात प्रत्यक्ष अंघोळ केली आहे. शिवालयात बसून जप केला आहे. पण हे सर्व ते खरेही म्हणू शकत नाहीत. कारण ते सर्व नंतर त्यांना शोधूनही सापडले नाही. तेथील कामगारही असले शिवालय तेथें नसल्याचे सांगत होते. अशा रीतीने जे खोटे ही म्हणता येत नाही व खरेही म्हणता येत नाही, तरीही जे प्रत्यक्ष अनुभवाला येते, त्याला ब्रह्म विज्ञानात माया म्हंटले असून त्या मायेचे वर्णन सदसाद्विलक्षण, म्हणजे सत् व असत् याहून वेगळे, असे केले आहे. अशा रीतीने हा निसर्गतःघडणारा प्रयोग म्हणजे ‘ तद् जलान्’ या ब्रह्म सिद्धांताचा साक्षात प्रयोग आहे. म्हणजे ‘ हे सर्व जग ब्रह्मापासून जन्मते, ब्रह्मात जगते व शेवटी ब्रह्मात विलीन होते’ या ब्रह्म विज्ञानाच्या शास्त्रीय सिद्धांताचे छोटेसे (miniature) एक प्रात्यक्षिकच आहे. असले प्रयोग पाश्चात्य देशातही निसर्गतच्च घडले असून अशाच एका प्रयोगाचे इंग्लंडच्या अतिंद्रिय विज्ञान संघाने (Society for Psychical Research) संशोधन करून त्याचे शास्त्रीय सत्य सिद्ध केले आहे.



जड जगाचे जडत्व म्हणजे भौतिक विज्ञानाचे जड नियम आध्यात्मिक दृष्ट्या खोटे, तकलादी, नश्वर मायिक ठरवणाऱ्या अशा घटनांची असंख्य उदाहरणे असून त्यापैकी पेट्रोल- शिवाय गाडी चालणे, तेलाशिवाय कित्येक वर्षे दीप जळत राहणे, मनुष्य अन्नपाण्याशिवाय संपूर्ण आयुष्य जगणे, आकाशगमन करणे, शस्त्राने कसलीही जखम न होणे, अग्नीने शरीर न भाजणे इ. अघटित (आध्यात्मिक) प्रकारांची काही उदाहरणे प्रस्तुत लेखकाच्या ‘ विज्ञान आणि चमत्कार’ या ग्रंथात दिली आहेत. ब्रह्म विज्ञानाची वचने वा भाकिते खरी ठरविणारे हे प्रयोग - ज्यापैकी काही निसर्गतःघडतात, काही माणसाच्या ईश्वर व गुरु भक्तीमुळे घडतात तर काही संत- सत्पुरुषांकडून हेतुतः घडविले जातात - या दृश्य जगाचे मायिक ( नाटकी) स्वरूप व ब्रह्म ( आत्म) तत्त्वाचे अविनाशित्व व अंतिम सत्य स्वरूप माणसाला पटवून देणे व या मायेला भुलून ऐहिक ( भौतिक) सुखोपभोगाच्या लालसेने जन्ममरणाच्या फेऱ्यात अडकू नये व त्यातून सुटका करून घेण्यासाठी या मूल तत्त्वाची- ईश्वराची- उपासना (भक्ती) करावी. (मामुपेत्य तू कौंतेय पुनर्जन्म न विद्यते । गीता) हा अध्यात्मिक धडा शिकवणे - या ईश्वरी उद्देशाने हे प्रयोग घडतात, घडवले जातात हे निश्चितपणे समजावे. जन्ममरणाचा हा फेरा माणसाच्या लालसेतून कसा होतो, हे कळण्यासाठी पुनर्जन्माचे शास्त्रीय सत्य व आध्यात्मिक महत्त्व समजून घेणे म्हणूनच आवश्यक आहे.

-------